**श्री. संत ज्ञानेश्वर विद्या प्रसारक मंडळ, नाशिक संचालित श्री. संत ज्ञानेश्वर माध्यमिक विद्यालय, उर्धुळ, जि.नाशिक या शाळेचे,माऊली बहुउद्देशिय संस्था, उर्धुळ, ता. चांदवड, जि.नाशिक या संस्थेस व्यवस्थापन हस्तांतराबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः माशाह-३११९/प्र.क्र.३४८/१९/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २७ जुलै, २०२३

वाचा : शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक माशाह २०११/(२१०/११)/माशि-३ दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२

संदर्भ : १) विभागीय शिक्षण उपसंचालक, नाशिक विभाग, नाशिक यांचे जा.क्र.शिउसं/नावि/माध्य.४/ हस्तां./३०१४४/४७/२०१८, दि.२६.१२.२०१८ चे पत्र.
२) शासन निर्णय क्रमांक:माशाह ३११९/प्र.क्र.३४८/एस.एम.१, दि.०६ फेब्रुवारी, २०२०

**प्रस्तावना :**

श्री.संत ज्ञानेश्वर विद्या प्रसारक मंडळ, तळेगांव रोही, ता. चांदवड, जि.नाशिक संचालित श्री.संत ज्ञानेश्वर माध्यमिक विद्यालय, उर्धुळ, ता. चांदवड, जि. नाशिक या मराठी माध्यमाच्या अनुदानित माध्यमिक (इ. ५ वी ते १० वी) शाळेचे, माऊली बहुउद्देशिय संस्था, उर्धुळ, ता. चांदवड, जि. नाशिक या संस्थेस व्यवस्थापन हस्तांतर करण्याचा संदर्भाधीन क्र.१ अन्वये प्रस्ताव प्राप्त झाला होता. परंतु आवश्यक कागदपत्रांची पूर्तता होत नसल्याने सदर प्रस्ताव संदर्भ क्र.२ अन्वये अमान्य करण्यात आला होता. आता संस्थांनी आवश्यक कागदपत्रांची पूर्तता केल्याने संदर्भ २ येथील निर्णयाचा फेरविचार करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

शाळेच्या व्यवस्थापन हस्तांतर प्रस्तावासाठी आवश्यक कागदपत्रांची संस्थांनी नव्याने पूर्तता केल्याने सदर शाळेचे व्यवस्थापन माऊली बहुउद्देशिय संस्था, उर्धुळ, ता. चांदवड, जि. नाशिक या संस्थेकडे हस्तांतरीत करण्यास खाली नमूद अटी व शर्तीवर मान्यता देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

(१) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळांची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही.

(२) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळांच्या बाबतीत शासन परवानगीच्या/मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाहीत याची खबरदारी घेण्यात यावी.

(३) शासनाकडून शाळा, शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेत्तर अनुदान, विद्यार्थी इ. बाबत वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ. चे पालन करणे नवीन संस्थेस बंधनकारक राहील.

(४) सदर व्यवस्थापन बदल, शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्रमांक: माशाह २०११/(२१०/११) माशि-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२ मध्ये विहित केलेल्या नियमानुसार व कार्यपद्धतीनुसार अंमलात येईल.

(५) सदर व्यवस्थापन बदलासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे नव्याने तक्रारी प्राप्त झाल्यास किंवा व्यवस्थापन बदला संदर्भातील अटी व शर्तीचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास किंवा व्यवस्थापन बदलापूर्वीच्या संस्थेतील कार्यरत शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या सेवाशर्तींचा नवीन संस्थेद्वारा भंग झाल्यास, हस्तांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, नाशिक विभाग, नाशिक यांनी सर्व बाबी तपासून व वरील अटी/शर्ती व्यतिरिक्त आवश्यक अटींचा समावेश करून, शाळेचे व्यवस्थापन बदलाबाबत पुढील कार्यवाही १५ दिवसांत करावी व त्याबाबत शासनास अवगत करावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७२७१५४०२९७१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने.

PRAVIN RAJARAM MUNDHE

Digitally signed by PRAVIN RAJARAM MUNDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DC78036626EC580D66C0AC502D43AF5F670B5BA13F51213AD071ACD53714A284, cn=PRAVIN RAJARAM MUNDHE
Date: 2023.07.27 16:11:57 +05'30'

**( प्रविण मुंढे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) विभागीय शिक्षण उपसंचालक, नाशिक विभाग, नाशिक.
३) शिक्षणाधिकारी ( माध्यमिक व उच्च माध्यमिक), जिल्हा परिषद, नाशिक
४) अध्यक्ष/ सचिव, श्री.संत ज्ञानेश्वर विद्या प्रसारक मंडळ, तळेगाव रोही, ता.चांदवड, जि. नाशिक
५) अध्यक्ष/सचिव, माऊली बहुउद्देशिय संस्था, उर्धुळ, ता. चांदवड, जि. नाशिक.
६) निवडनस्ती (एसएम-१).